राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्ती वेतनधारकांची सर्व प्रदाने कोषागारांमार्फत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः स्वासैनि २०१३/प्र.क्र.२१६ / स्वासैक १

मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
तारीख: १५ डिसेंबर २०१४

**वाचा :** शासन परिपत्रक, क्रमांकः सामान्य प्रशासन, विभाग क्रमांक स्वासैक- २०१३/प्र.क्र. २१६/ स्वासैक-१ दिनांक २१ फेब्रु. २०१४.

## परिपत्रक

राज्यात, सन १९६५ पासून स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्तीवेतन योजना राबविण्यात येत असून स्वातंत्र्यसैनिकांना जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत निवृत्तीवेतन अदा केले जात होते. शासन निर्णय दिनांक २२ जुलै, १९८६ नुसार बँकेमार्फत निवृत्तीवेतन घेण्यास इच्छुक असलेल्या स्वातंत्र्य सैनिकांना बँकांमार्फत निवृत्तीवेतन घेण्याचा पर्याय देण्यात आला. तथापि स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतनावर झालेल्या खर्चाची माहिती बँकांकडून जिल्हाधिकारी कार्यालयांना विहित कालावधीत पुरविण्यात येत नाही, परिणामी खर्चाची एकत्रित माहिती शासनास प्राप्त होत नाही. त्यामुळे अनेक वित्तीय व प्रशासकीय अडचणी उद्भवतात. यास्तव राज्यातील राज्य स्वातंत्र्य सैनिक निवृत्तीवेतनधारकांना स्वातंत्र्य सैनिक सन्मान निवृत्तीवेतन व अन्य सवलतीबाबतची प्रदाने कोषागारांमार्फत करण्याचा निर्णय शासनाने दि.१०.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर सांकेतांक २०१४१२१११६४२४८६००७ वर उपलब्ध आहे. व त्याची अंमलबजावणी दि.१.४.२०१५ पासून करण्याचा देखील निर्णय शासनाने घेतला आहे. त्यामुळे दि. १.४.२०१५ नंतरची निवृत्तीवेतनाची प्रदाने थेट बँकांनी करु नयेत. याअनुषंगाने सर्व जिल्हाधिकारी व जिल्हा कोषागार अधिकारी यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१) राज्य शासनाकडून स्वातंत्र्य सैनिकांना निवृत्तीवेतन मंजूर झाल्यानंतर महालेखापाल यांच्याकडून प्राप्त होणा-या निवृत्तीवेतन प्रदान आदेशाची (PPO) माहिती कोषागारांनी निवृत्ती वेतन वाहिनी या प्रणालीत भरावी व प्रत स्कॅन करुन ती स्वातंत्र्य सैनिकांच्या माहितीसोबत जतन करावी. तसेच निवृत्तीवेतनधारकांच्या स्वाक्षरीचा नमुनासुध्दा जतन करुन ठेवावा.

२) जे स्वातंत्र्य सैनिक सध्या बँकांमार्फत निवृत्तीवेतन घेत आहेत, त्यांचे मूळ निवृत्तीवेतन प्रदान आदेश (original PPO) जिल्हाधिकारी यांनी बँकाकडून मागवून घ्यावेत व जिल्हाधिकारी कार्यालयात त्याची नोंद घेऊन ते कोषागार कार्यालयाकडे सुपूर्द करावेत. मात्र बँकेकडे प्रदान आदेशाची (PPO) मूळ प्रत नसल्यास बँकांनी सोबतच्या विहित नमुन्यातील प्रमाणपत्र जिल्हाधिकारी यांना द्यावे व जिल्हाधिकारी यांनी ते आपल्या कार्यालयात नोंदवून कोषागार कार्यालयाकडे पाठवावे.

जे स्वातंत्र्य सैनिक सध्या जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत निवृत्तीवेतन घेत आहेत, त्यांचे मूळ निवृत्तीवेतन प्रदान आदेश (original PPO) जिल्हाधिकारी यांनी कोषागार कार्यालयाकडे पाठवावेत. मात्र जिल्हाधिकारी यांचेकडे

प्रदान आदेशाची मूळ प्रत नसल्यास त्यांनी सुद्धा सोबतच्या विहीत नमुन्यातील प्रमाणपत्र कोषागार कार्यालयाकडे पाठवावे.

३) कोषागार कार्यालयाने निवृत्तीवेतन अदा करण्यापूर्वी सर्व निवृत्तीवेतनधारकांची (जुने व नवीन) ओळख परीक्षा ( Identification parade) करुन घ्यावी. याकरिता निवृत्तीवेतन धारकाचे आणि जोडीदाराचे छायाचित्र काढून घ्यावे व ते स्कॅन करुन ठेवावे.

४) निवृत्तीवेतनाच्या प्रदानासाठी संबंधित निवृत्तीवेतनधारकाने राष्ट्रीयीकृत बँकेमध्ये बचत खाते उघडावे. मात्र या खात्यास एटीएमची तसेच सहखातेदाराची सुविधा देण्यात येऊ नये.

५) स्वातंत्र्यसैनिकांना व स्वातंत्र्यसैनिकांच्या विधवांना प्रतिवर्षी रु. १०,०००/- च्या मर्यादेपर्यंत वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय आहे. त्यानुसार स्वातंत्र्यसैनिकांनी किंवा स्वातंत्र्यसैनिकांच्या विधवा पत्नीने प्रतिपूर्तीचा दावा केल्यानंतर त्याची योग्य छाननी जिल्हाधिकारी कार्यालयाने करुन त्याबाबत मंजूरी आदेश निर्गमित करावेत व त्याबाबतचे प्रदान कोणास करावे हे देखील मंजूरी आदेशातच नमूद करावे. या मंजूरी आदेशाच्या आधारे कोषागार कार्यालयाने वैद्यकीय प्रतिपूर्तीची रक्कम स्वातंत्र्य सैनिकास अदा करावी.

६) तसेच स्वातंत्र्य सैनिक किंवा त्याच्या/तिच्या जोडीदाराच्या मृत्यूनंतर किंवा स्वातंत्र्य सैनिकाच्या मुलीच्या लग्नप्रसंगी द्यावयाची आर्थिक मदत अशा प्रकारच्या प्रदानांसंदर्भात जिल्हाधिकारी कार्यालयाने मंजूरी आदेश काढल्यानंतर त्या आदेशाच्या आधारे कोषागाराने संबंधितास प्रदान करावे. असे प्रदान कोणास करावे हे जिल्हाधिकारी कार्यालयाने मंजुरी आदेशातच नमूद करावे.

७) कोषागार कार्यालयाने निवृत्तीवेतन धारकाच्या हयातीचे प्रमाणपत्र (Life Certificate) वर्षातून दोन वेळा म्हणजेच दि. १ जानेवारी व दि. १ जुलै रोजी घ्यावे. त्याशिवाय निवृत्तीवेतनाचे प्रदान करण्यात येऊ नये. हयातीचे प्रमाणपत्र विलंबाने दिल्यास थकबाकीसह निवृत्तीवेतन देण्यात यावे.

८) स्वातंत्र्यसैनिकाच्या मृत्यूनंतर त्याच्या विधवा पत्नीस पेन्शन मंजूर करण्याचे अधिकार क्र. पीओएस १०८२/५७७/विक-१/स्वासैकक्ष दि.३ ऑगस्ट,१९८३ अन्वये संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना देण्यात आले आहेत. मात्र विधवा पत्नीच्या मृत्यूनंतर कोणासही निवृत्तीवेतन अनुज्ञेय नाही.

९) निवृत्तीवेतन धारकाचा मृत्यू झाल्यास, त्याची माहिती त्याच्या नातेवाईकांकडून किंवा बँकेकडून किंवा अन्य प्रकारे प्राप्त झाल्यानंतर कोषागार कार्यालयाने निवृत्तीवेतनाचे पुढील प्रदान ताबडतोब थांबवावे. तसेच निवृत्ती वेतन धारकाच्या मृत्यू नंतरच्या कालावधीचे अतिप्रदान होत असेल तर तेवढी रक्कम मुक्त (Release) न करण्याबाबत संबंधित बँकेस कळवावे व बँकांनी सदरची रक्कम कोषागार कार्यालयाकडे वळती करावी.

१०) स्वातंत्र्य सैनिक किंवा त्यांचा जोडीदार यांचा मृत्यू झाल्यानंतर व वरील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कोषागाराने बँकेस तसे कळविल्यानंतर, जर निवृत्ती वेतनाची थकीत रक्कम देय होत असेल, तर ती नामनिर्देशित व्यक्तीस (Nominee) अदा करण्यात यावी. परंतू कोणासही नामनिर्देशित केले नसल्यास वारस प्रमाणपत्राच्या आधारे थकीत निवृत्तीवेतन अदा करावे.

११) निवृत्ती वेतनधारक मानसिकदृष्टया अपंग (mentally retarded) असल्यास अशा निवृत्तीवेतन धारकाच्या पालकास, निवृत्तीवेतन धारकाच्या बँकेतील बचत खात्यामध्ये, अपवाद म्हणून, सहखातेदार म्हणून ठेवता येईल. मात्र या बाबत कोषागार अधिका-यांनी खात्री करुन घ्यावी व संबंधित बँकेस तसे कळवावे. त्याशिवाय बँकेने सहखातेदाराची सुविधा परस्पर देऊ नये.

१२) निवृत्तीवेतन वाहिनी प्रणालीचे प्रशिक्षण घेऊन, नंतर जिल्हाधिकारी कार्यालयांतील कर्मचाऱ्यांना प्रशिक्षित करण्यासाठी विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या कार्यालयातील सुयोग्य अधिकाऱ्याची नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करुन त्याचे नाव जिल्हाधिकारी, कोषागार अधिकारी व शासनास कळवावे.

१३) निवृत्तीवेतन वाहिनी प्रणालीमध्ये माहिती (data) भरण्यासाठी आवश्यक असलेले प्रशिक्षण दि. ०८/०१/२०१५ रोजी सकाळी ११.०० ते सायं. ५.०० वा. पर्यंत परिषद सभागृह, सहावा मजला, मंत्रालय, (विस्तार) मुंबई-३२ येथे आयोजित करण्यात आले आहे. जिल्हाधिकारी कार्यालयात स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतनाची प्रकरणे हाताळणारे अधिकारी/ कर्मचारी यांना सदर प्रशिक्षणासाठी जिल्हाधिकारी यांनी पाठवावे. तसेच वरील परिच्छेद १२ मध्ये नमूद केलेल्या नोडल अधिकाऱ्यांनी सुद्धा प्रशिक्षणास हजर रहावे.

१४) वरील प्रशिक्षणानंतर विभागीय कार्यालयात खालील तक्त्यात दिलेल्या कार्यक्रमाप्रमाणे कार्यशाळा आयोजित केलेली आहे.

| अ. क्र (१) | कार्यशाळा आयोजनाचे ठिकाण (२) | कार्यशाळेचा कालावधी दिनांक व वेळ (३) | कार्यशाळेस कोणी उपस्थित रहावे. (४) |
|---|---|---|---|
| १ | विभागीय आयुक्त, नागपूर यांचे कार्यालय | दि. १९ व २० /०१/२०१५ सकाळी १०.३० ते सायं. ४.०० वा. | नागपूर व अमरावती विभागीय आयुक्तलयातील संबंधित नोडल अधिकारी व सदर दोन्ही विभागीय आयुक्त कार्यालयाच्या अधिनस्त असलेल्या जिल्हाधिकारी कार्यालयातील स्वा. सै. निवृत्तीवेतन प्रकरणे हाताळणारे अधिकारी/ कर्मचारी |
| २ | विभागीय आयुक्त नाशिक यांचे कार्यालय | दि.१९ व २० /०१/२०१५ सकाळी १०.३० ते सायं. ४.०० वा | पुणे व नाशिक विभागीय आयुक्तालयातील संबंधित नोडल अधिकारी व सदर दोन्ही विभागीय आयुक्त कार्यालयाच्या अधिनस्त असलेल्या सर्व जिल्हाधिकारी कार्यालयातील स्वा. सै. निवृत्तीवेतन प्रकरणे हाताळणारे अधिकारी/ कर्मचारी |
| ३ | विभागीय आयुक्त औरंगाबाद यांचे कार्यालय | दि. २२ व २३ /०१/२०१५ सकाळी १०.३० ते सायं. ४.०० वा | औरंगाबाद विभागीय आयुक्तालयातील संबंधित नोडल अधिकारी व सदर विभागीय आयुक्त कार्यालयाच्या अधिनस्त असलेल्या सर्व जिल्हाधिकारी कार्यालयातील स्वा. सै. निवृत्तीवेतन प्रकरणे हाताळणारे अधिकारी/ कर्मचारी |
| ४ | विभागीय आयुक्त कोकण यांचे कार्यालय कोकण भवन, सी.बी. डी. बेलापूर. नवी मुंबई | दि.२२ व २३ /०१/२०१५ सकाळी १०.३० ते सायं. ४.०० वा | कोकण विभागीय आयुक्तालयातील संबंधित नोडल अधिकारी व त्यांच्या अधिनस्त असलेल्या जिल्हाधिकारी कार्यालयातील स्वा. सै. निवृत्तीवेतन प्रकरणे हाताळणारे अधिकारी/ कर्मचारी |

वरील कार्यशाळा सकाळी १०.३० ते ४.०० वा. पर्यंत घ्यावयाची आहे, त्याचे आयोजन वरील तक्त्यातील स्तंभ २ मधील विभागीय आयुक्त कार्यालयाने करावे. व त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये नमूद केलेल्या विभागीय आयुक्त कार्यालयांतर्गत येणाऱ्या सर्व जिल्हाधिकारी कार्यालयातील संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांनी उपस्थित रहावे. (उदा. विभागीय आयुक्त–नागपूर व अमरावती यांच्या अधिनस्त सर्व जिल्हाधिकारी कार्यालयांतील संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांनी विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या कार्यालयात दि.१९ व २० जानेवारी २०१५ या दिवशी कार्यशाळेमध्ये उपस्थित रहावयाचे आहे). या कार्यशाळेसाठी स्तंभ-२ मध्ये नमूद केलेल्या विभागीय आयुक्तालयाने किमान १५ संगणक (इंटरनेटसुविधेसह) व सादरीकरणासाठी आवश्यक प्रोजेक्टर इ.ची व्यवस्था करावी.

१५) या कार्यशाळेमध्ये सहभागी होतांना जिल्हाधिकारी, कार्यालयाच्या अधिकारी/ कर्मचारी यांनी त्यांच्या जिल्हयातील निवृत्तीवेतनधारक स्वातंत्र्य सैनिकाची माहिती (data entry) त्याच कार्यशाळेत भरावयाची आहे. त्यासाठी आवश्यक माहिती त्यांनी सोबत आणावी. नंतर प्रत्यक्ष काम करताना जिल्हाधिकारी कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी यांना तांत्रिक अडचण आल्यास वरील परिच्छेद १२ मध्ये नमूद केलेल्या नोडल अधिकारी यांनी त्यांना मार्गदर्शन करावे.

१६) जिल्हाधिकारी कार्यालयाच्या हलगर्जीपणामुळे कोणत्याही स्वातंत्र्य सैनिकाचे कोणतेही प्रदान दि. १.०४.२०१५ नंतर प्रस्तावित प्रणालीच्या माध्यमातून झाले नाही किंवा स्वातंत्र्यसैनिकास प्रदान वेळीच दिले गेले नाही, तर जबाबदारी निश्चित करण्यात येईल. ही बाब सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात यावी.

१७) सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१५१२५३५१८१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Shrikant Marutrao Deshpande

Digitally signed by Shrikant Marutrao Deshpande
DN: c=IN, o=All India Services, ou=IAS, postalCode=110001, st=New Delhi, cn=Shrikant Marutrao Deshpande
Date: 2014.12.15 13:04:43 +05'30'

**(श्रीकांत देशपांडे)**
सचिव व विचौअ-१

**प्रत,**

१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व जिल्हाधिकारी,महाराष्ट्र राज्य,
३) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४) सह संचालक (सुधारणा), लेखा व कोषागार संचालनालय, नविन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई ३२.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
७) निवड नस्ती (स्वासैक- १).

# प्रमाणपत्र

श्री. ................ ....(संपूर्ण नाव)........... , राहणार ......... (पूर्ण पत्ता).............. हे या बँकेकडून/ जिल्हाधिकारी कार्यालयाकडून स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन घेत आहेत. दि.१.४.२०१५ पासून त्यांची निवृत्तीवेतनादी सर्व प्रदाने कोषागार कार्यालयामार्फत करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. तथापि श्री....................(संपूर्ण नाव).................. यांच्या निवृत्तीवेतन प्रदान आदेशाची मूळ प्रत (original PPO) या कार्यालयात तात्काळ आढळून येत नसल्याने, असे प्रमाणित करण्यात येते की, श्री. .................... (संपूर्ण नाव).................. हे सध्या दरमहा रु.१०,०००/- (रुपये दहा हजार फक्त) इतके स्वातंत्र्यसैनिक निवृत्तीवेतन घेत आहेत.

ठिकाण:-
दिनांक :-

अधिका-याचे नाव :-
हुद्दा:-
कार्यालयाचा पत्ता:-
शिक्का :-